नांदेपेरा बंधारा ता. वणी जि. यवतमाळ
बंधारा व कालव्याच्या विशेष दुरूस्ती कामास
प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१६/ (प्र.क्र. ५५४/२०१६)/ सिं.व्य.(कामे)
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक: ३०/०६/२०१७.

वाचा :- १. कार्यकारी संचालक,विदर्भ् पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.६२८३/ विपाविम/कातां-७(२)/अपामं/सिं.व्य. /(५०२/२०१५) /सन २०१६, दि.०१.०८.२०१६.
२. शासन निर्णय संकीर्ण २०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि.२६.०५.२०१७.

प्रस्तावना :-

यवतमाळ जिल्हयाच्या वणी तालुक्यातील नांदेपेरा बंधारा हा गोदावरी खोरे अंतर्गत पैंनगंगा उपखोऱ्यात आहे. हा प्रकल्प मौजा नांदेपेरा ता. वणी , जि यवतमाळ गावाच्या वरील बाजूस स्थानीक नाल्यावर १९६३ मध्ये बांधण्यात आलेला आहे. सदर बंधा-याची लांबी ४५ मीटर असून महत्तम उंची १.८३ मीटर आहे. दर वर्षी बंधा-याच्या नाल्याला रब्बी हंगामापर्यंत पाणी राहते. बंधा-याचे संकल्पित लाभक्षेत्र १८२ हेक्टर आहे. प्रवाही सिंचन पूर्ण क्षमतेने न होण्यामागे बंधारा दुरूस्ती व वितरण प्रणालीच्या विमोचकाची पॉइंटिंग जीर्ण होऊन उखडले जाऊन बांधकामे पडलेली आहेत. त्यामूळे कालव्यात पाणी जात नसल्याने ९५ % लाभक्षेत्र सिंचनापासून वंचित राहते. सदर कामाची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी, पाणी वापर संस्थेने व लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांनी वेळोवेळी केलेली होती. सदर काम केल्यामुळे १७३ हे. क्षेत्र पूर्नस्थापित होणार आहे. याअनुषंगाने संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर दुरूस्तीच्या कामाकरीता विशेष दुरूस्ती प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर अंतर्गत यवतमाळ जिल्हयाच्या वणी तालुक्यातील नांदेपेरा बंधारा व उजव्या कालव्याच्या बांधकाम दुरूस्तीच्या कामांसाठी विशेष दुरूस्ती अंतर्गत संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये प्रस्तावित कामांच्या रू. १९,४९,४१०/-व अनुषंगिक खर्च रू. ६०,१२१/-अशा एकूण रू. **२०,०९,५३१/-** (रू. वीस लक्ष, नऊ हजार, पाचशे एकतीस फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या अधिकारान्वये व आंतरवित्त सल्लागार तथा उप सचिव यांच्या सहमतीने खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि.१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचनानुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

२. प्रकल्पा वरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे; कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे.

३. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने , बाहय दरसूचीबाबी व वहन अंतरे सक्षमस्तरावर तपासून अंदाज पत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

४. कालवा स्वच्छता व माती भरावाची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत. तथापि, यांत्रिकी संघटनेकडे मशिनरी उपलब्ध नसल्यास तसे प्रमाणपत्र यांत्रिकी संघटनेकडून प्राप्त करून घ्यावे.

५. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

६. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (११) विदर्भ प्रदेश, (११) (०१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ७४९९) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे), कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. २२ सन २०१७-१८ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६३०१७१९४८६१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.06.30 17:17:41 +05'30'

**(न.गौ .बसेर)**
**शासनाच्या अवर सचिव**

सोबत :- परिशिष्ट-अ

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय.
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.

५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.

७) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

९) प्रधान सचिव(जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.

१०) सचिव(जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.

११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.

१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर.

१३) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.

१४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती.

१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६) अधीक्षक अभियंता, यवतमाळ सिंचन मंडळ, यवतमाळ.

१७) कार्यकारी अभियंता, यवतमाळ पाटबंधारे विभाग, यवतमाळ.

१८) सिं.व्य. (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१६/ (प्र.क्र.५५४/२०१६)/ सिं.व्य.(कामे) दि. **३० /०६**/२०१७ चे सहपत्र

**परिशिष्ट-अ**

| **अ.क्र.** | **कामाचा तपशिल** | **प्र.मा.रक्कम (रूपयात)** |
|---|---|---|
| **१** | **२** | ३ |
| १ | बंधारा सुरक्षितता कामे | ३,६७,१४५/- |
| २ | मुख्य कालवा व उप कालवा यांचे मातीकाम, बांधकाम दुरुस्ती व अस्तरीकरणाची कामे | १५,८२,२६५/- |
| ३ | इतर कामे | निरंक/- |
| | **एकूण बांधकाम खर्च** | **१९,४९,४१०/-** |
| | अनुषंगिक खर्च | ६०,१२१/- |
| | **एकूण** | **२०,०९,५३१/-** |

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.06.30 17:17:54 +05'30'

(न.गौ .बसेर)
शासनाच्या अवर सचिव